**विजाभज आश्रमशाळांशिक्षक /शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या अनुज्ञेयतेची कमाल मर्यादा व मंजूरीचे अधिकारामध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- विभशा २०१३/प्र.क्र.१७२/विजाभज-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ:** (१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. वैखप्र -२०११/प्र.क्र. ३३३/ २०११/ राकावि-२, दि. १६ नोव्हेंबर, २०११.
(२) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग,क्र. वैखप्र -२०११/प्र.क्र.१६/२०१६/ राकावि-२, दि. १६ मार्च, २०१६..

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यातील विजाभज आश्रमशाळेतील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ मधील तरतूदीच्या अधीन राहून आकस्मिक उद्बभवणा-या २७ आजारांवर रुग्णालयात घेतलेल्या उपचारांचारील तसेच ५ गंभीर आजारावर शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारावरील वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रुपये १,००,०००/- (अक्षरी रुपये एक लाख फक्त) च्या मर्यादेत प्रतिपूर्तीस मंजूरी देण्याचे अधिकार कार्यालय प्रमुखांना आहेत. या मर्यादेवरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीची प्रकरणे संबंधित प्रशासकीय विभागाकडे सादर केली जातात.

२. सद्यस्थितीत औषधाच्या किंमतीत व उपचार पध्दतीवरील खर्चामध्ये झालेली वाढ तसेच अशी प्रकरणे संबंधित निकाली काढण्यास लागणारा कालावधी इ. विचार करुन तसेच विजाभज आश्रमशाळा कर्मचारी संघटनेची मागणी, त्याअनुषंगाने शासनस्तरावर झालेल्या बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाचा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय विचारात घेऊन या विभागाच्या आधिपत्याखालील विभागप्रमुखाच्या वैद्यकीय प्रतिपूर्तीच्या अनुज्ञेयतेच्या कमाल मर्यादेमध्ये वाढ करण्याबाबत व मंजूरीचे अधिकारामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयानुसार विजाभज आश्रमशाळां शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या अनुज्ञेयतेची कमाल

मर्यादेमध्ये वाढ करण्याबाबत व मंजूरीचे अधिकारामध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| अधिकार | पूर्वीचे अधिकार | सुधारित अधिकार |
|---|---|---|
| १) सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण | - | रु.५०,०००/- पर्यंत |
| २) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण | - | रु.५०,००१/- ते १,५०,०००/- पर्यंत |
| ३)संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | रु.१,००,०००/- | रु.१,५०,००१/- ते रु. ३,००,००० /- पर्यंत |

२. रुपये ३,००,०००/- वरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या प्रकरणांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील तरतुदीच्या अधीन राहून मंजूरी देण्याचे पूर्ण अधिकार संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुखांना राहतील.

३. वर नमूद केल्याप्रमाणे सहाय्यक आयुक्त/प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण व संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र संचालनालय,पुणे यांचे स्तरावर वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या प्रकरणांना मंजूरी देताना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील तरतुदींची काटेकोरपणे तपासणी करुन मंजूरी देण्यात यावी.

४. हा शासन निर्णय या निर्णयाच्या दिनांकाला प्रलंबित प्रकरणांनाही लागू राहील.

५. सदर शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभागास वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र ५/१६/सेवा-५ दि,१५.२.२०१६ नुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हे आदेश संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. वैखप्र -२०१६/प्र.क्र.१६/ २०१६/ राकावि-२, दि. १६ मार्च, २०१६ नुसार वाढविण्यात आलेल्या मर्यादेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११०२१५२८४४८५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2016.11.02 15:32:01 +05'30'

(अ.कों. अहिरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई

३) मा. मंत्री (सा. न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव,
४) मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई ( सर्व )
५) मा.राज्यमंत्री (सा. न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव, मुंबई
६) मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुंबई( सर्व )
७) विधानमंडळाच्या सर्व समित्याचे प्रमुख
८) मा. सर्व विधानसभा /विधानपरिषद सदस्य, विधान भवन, मुंबई
९) मुख्य सचिव
१०) सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव,मंत्रालय मुंबई
११) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे
१२) आयुक्त, अपंगकल्याण आयुक्तालय, पुणे
१३) संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१५) सर्व जिल्हाधिकारी
१६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१७) शिक्षण संचालक ( प्राथमिक ) महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ) महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) अध्यक्ष महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
२०) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
२१) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
२२) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
२३) निवडनस्ती.